प्रादेशिक योजना - पुणे
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम, १९६६ चे कलम-२०(४)
अन्वये फेरबदल मंजूर करणेबाबत.
मौजे भिलारेवाडी, ता.हवेली येथील
स.नं.११ येथील ही जमिन रहिवास
विभागात समाविष्ट करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-मुमंस/टिपीएस-१८०९/१८२/प्र.क्र.१८५६/०९/नवि-१३
दिनांक :- २६.०८.२००९

शासन निर्णय :- सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रा मध्ये प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(वि. म. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
जिल्हाधिकारी, पुणे.
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करून त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.

निवडनस्ती (नवि-१३).

New Notification 20(4) file-09

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Date – 26.08.2009**

**No.CMS/TPS-1809/182/C.R.1856/2008/UD-13**

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

Whereas, the Government in Urban Development Department vide Notification No. TPS-1895/227/CR-26/UD-13, dated 25th November 1997 has sanctioned the Regional Plan for Pune district (hereinafter referred to as "the said Regional Plan") under section 15 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as "the said Act") so as to come into force with effect from 10th February 1998;

And whereas, as per the proposals of the said Regional Plan, the land bearing S.No. 11(pt) of Mouje: Bhilarewadi, i.e. Old S.No.105(Pt) of Mouje: Katraj, Taluka: Haveli (hereinafter referred to as "the said land") is included in "Hill Top/Hill Slope Zone" (hereinafter referred to as "the said zone");

And whereas, Dr.Vinod Shah, Director Janaseva Foundation, Pune has requested Government to include the said land in "Public/Semi public Zone";

And whereas, after consultation with the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that it is necessary to change the zone of the said land from "Hill Top/Hill Slope Zone" to "Afforestation Zone" and to modify the said Regional Plan as per provisions of Section 20(2) of the said Act, so as to include the said land in "Afforestation Zone" (hereinafter referred to as "the said modification");

And whereas, the notice regarding the proposed modification under sub-section (3) of Section 20 of the said Act inviting suggestions/objections from general public vide Urban Development Department's Notice No.CMS/TPS-1809/182/CR-1856/09/UD-13, dated 25th June, 2009 was published which appeared in Maharashtra Government Gazette, Part-I, Pune Division Supplement, dated 9th July, 2009 at pages 2219 to 2221. The Assistant Director of Town Planning, Pune Branch, Pune was appointed as an Officer by Government to hear suggestions/objections and submit his report to Government (hereinafter referred to as "the said Officer");

And whereas, after considering the report submitted by the said Officer and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that the zoning of the said lands shall be changed from Hill Top/Hill Slope Zone to Afforestation Zone with certain conditions.

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub-section (4) of Section 20 of the said Act, the Government hereby finally sanctions the said modification proposal and for that purpose, modifies the notification sanctioning the said Regional Plan as follows:-

In the schedule of modifications appended to the Notification dated 25th November 1997 sanctioning the said Regional Plan, after the last entry, the new entry is added-

**: Entry :**

"The land bearing S. No.11(pt) of Village Bhilarewadi i.e. ;Old S.No. 105 (pt) of Village Katraj, Taluka: Haveli, Dist: Pune is deleted from Hill Top/Hill Slope Zone and included in "Afforestation Zone" on the following conditions:-

**Conditions-**

1) All the required infrastructure facilities shall be provided by the developer/land owners at his own cost.
2) Any construction/development shall not be permissible on the land having slope equal to or steeper than 1:5.

**Note:-**

(A) The plan bearing No. CMS/TPS-1809/182/ C.R.1856/ 2008/UD-13, showing the said modification is available for inspection by the general public during office hours on all working days at the following offices for a period of one month.

1) The Assistant Director of Town Planning, Pune Branch, Pune, 283, Narayan Peth, Kalavatibai Mavale Corporation Dispensary Building, 1st Floor, Pune-411030.
2) The Collector of Pune.

(B) This notification is also available on Govt. web site www.urban.maharashtra.Gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(V.M. Ranade)
Under Secretary to Government

New Notification 20(4) file 09

# अधिसूचना

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २६.०८.२००९

क्रमांक-मुमंस/टिपीएस-१८०९/१८२/प्र.क्र.१८५६/०९/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, पुणे जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख "उक्त प्रादेशिक योजना" असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम १५ अनुसार (यापुढे ज्याचा उल्लेख"उक्त अधिनियम" असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र शासनाच्या नगरविकास विभागाची अधिसूचना क्रमांक टीपीएस-१८९५/२२७/प्र.क्र.२६/९५/नवि-१३, दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ (यापुढे "उक्त अधिसूचना" असा उल्लेख केलेली) अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १० फेब्रुवारी १९९८ पासून अंमलात आली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावानुसार मौजे: भिलारेवाडी, तालुका: हवेली, जिल्हा पुणे येथील स.नं. ११(पै),जुना स.नं.१०५ (पै), मौजे: कात्रज ही जमिन (यापुढे जिचा उल्लेख "उक्त जमिन" असा करण्यात आला आहे) "डोंगरमाथा-डोंगरउतार विभागात" समाविष्ट आहे (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त विभाग" असा करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, अर्जदार डॉ.विनोद शहा, अध्यक्ष, जनसेवा फाऊंडेशन, पुणे यांनी उक्त जमीन "डोंगरमाथा-डोंगरउतार" विभागातून वगळून "सार्वजनिक/निमसार्वजनिक " विभागात समाविष्ट करणेची विनंती शासनास केली आहे;

आणि ज्याअर्थी, संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेशी विचारविनिमय करुन उक्त जमीन "डोंगरमाथा-डोंगरउतार विभागातून" वगळून "वनीकरण विभागात" समाविष्ट करणे आवश्यक आहे, आणि त्यासाठी उक्त जमीन उक्त अधिनियमाच्या कलम २०(२) मधील तरतुदीनुसार वनीकरण विभागात समाविष्ट करण्याकरिता उक्त प्रादेशिक योजना सुधारित करणे आवश्यक आहे असे शासनाचे मत झाले आहे (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त फेरबदल" असा करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २० चे पोट-कलम (३) च्या तरतुदीनुसार उक्त जमिन डोंगरमाथा-डोंगरउतार विभागातून वगळून वनीकरण विभागात समाविष्ट करण्यासाठी शासनाच्या नगर विकास विभागाने क्रमांक-मुमंस/टीपीएस-१८०९/१८२/सीआर-१८५६/०९/नवि-१३, दिनांक २५ जून २००९ अन्वये आम जनतेच्या हरकती/सूचना मागविण्यासाठीची नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-१, पुणे विभागीय पुरवणीत दिनांक ९ जुलै, २००९ रोजी पृष्ठ २२१९ ते २२२१ वर प्रसिध्द केली आणि विहित मुदतीत प्राप्त सूचना/हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता अधिकारी म्हणून सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली होती (यापुढे "उक्त अधिकारी" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिका-याच्या प्राप्त अहवालावर संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त

जमीनी खालील अटींसापेक्ष डोंगरमाथा-डोंगरउतार विभागातून वगळून वनीकरण विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे;

त्याअर्थी, आता, उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोट-कलम (४) व त्या अनुषंगाने प्राप्त अधिकारात शासन उक्त जमिनीबाबत उक्त फेरबदल प्रस्तावास खालील अटींसापेक्ष पुढीलप्रमाणे मंजुरी देत आहे व त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजुरीच्या दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ च्या अधिसूचनेमध्ये खालीलप्रमाणे फेरबदल करीत आहे;

उक्त प्रादेशिक योजनेला मंजुरी देण्याच्या दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ रोजीच्या उक्त अधिसूचनेतील फेरबदलाच्या अनुसूचीमध्ये शेवटीच्या नोंदीनंतर पुढील नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे.

**नोंद** :-

मौजे:भिलारेवाडी, स.नं.११ (पै) यास मौजे: कात्रज, जुना स.नं.१०५ (पै), तालुका:हवेली, जिल्हा: पुणे ची जमीन डोंगरमाथा-डोंगरउतार विभागातून वगळून वनीकरण विभागात खालील अटींसापेक्ष समाविष्ट करणेत येत आहे.

**अटी** :-

**अट क्र.१** - प्रश्नाधिन जमिनीकरिता आवश्यक असणा-या सर्व पायाभूत सुविधा विकसक/मिळकतधारक स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

**अट क्र.२** - १:५ किंवा त्यापेक्षा जास्त उताराच्या क्षेत्रावर कोणतेही बांधकाम किंवा विकास अनुज्ञेय होणार नाही.

**टीप**:-

**(अ)** उक्त मंजूर फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा क्रमांक-मुमंस/टिपीएस-१८०९/१८२/प्र.क्र.१८५६/०९/नवि-१३,नागरिकांच्या अवलोकनार्थ कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये खाली नमूद केलेल्या कार्यालयांमध्ये एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

(१) सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे, २८३, नारायण पेठ, कलावतीबाई मावळे कॉर्पोरेशन दवाखाना इमारत, पहिला मजला, पुणे-४११०३०.

(२) जिल्हाधिकारी, जिल्हा पुणे.

**(ब)** सदर फेरबदलाची अधिसूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(वि.म.रानडे)**

**शासनाचे अवर सचिव, महाराष्ट्र राज्य**